कार्यकारी संचालक (मा.सं), महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या. या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत

**श्रीमती सुचिता भिकाने, अपर जिल्हाधिकारी**

महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन आदेश क्र. संकीर्ण-२०२५/प्र.क्र. ५८/ऊर्जा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दि. ३० एप्रिल, २०२५

**संदर्भ**:-१. सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र. एसआरव्ही- २०११/प्र.क्र.१३७/ कार्या-१२, दि.१७.१२.२०१६.

२. सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्र. एसआरव्ही- २०११/प्र.क्र.५१०/ कार्या-१२, दि.१६.०२.२०१८.

३. महसूल व वन विभागाचा शासन निर्णय क्र. पदोन्नती-२०२५/प्र.क्र.७०/ई-१, दि. २२.०४.२०२५.

४. श्रीमती सुचिता भिकाने, अपर जिल्हाधिकारी यांचा दि. २४.०४.२०२५ चा अर्ज.

**शासन आदेश**:-

श्रीमती सुचिता भिकाने, उप जिल्हाधिकारी तथा सहायक आयुक्त (भूसंपादन), कोकण विभाग यांची पदोन्नती संदर्भ क्र.०३ च्या महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयाद्वारे अपर जिल्हाधिकारी, गट-अ (वेतनश्रेणी एस-२५) या संवर्गात झाली आहे. तसेच सदर शासन निर्णयाद्वारे श्रीमती भिकाने यांची तीन वर्षांकरिता प्रतिनियुक्तीने पदस्थापना अपर जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई म्हणून करण्यात आली आहे.

२. अपर जिल्हाधिकारी पदनाम असलेले पद महापारेषण कंपनीच्या आस्थापनेवर उपलब्ध नाही. यास्तव श्रीमती सुचिता भिकाने, अपर जिल्हाधिकारी यांची " कार्यकारी संचालक (मानव संसाधन), महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या., मुंबई" या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांचे काळातील प्रदाने) नियम १९८१ मधील नियम ४० परिशिष्ट २ मधील विहित अटी व शर्ती तसेच सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि. १७.१२.२०१६ व दि. १६.०२.२०१८ मधील तरतुदीनुसार श्रीमती भिकाने यांची तीन वर्षांकरिता प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. मात्र आवश्यकतेनुसार त्यांच्या सेवा त्यापूर्वीही मूळ विभागास परत करता येतील.

४. या आदेशान्वये, श्रीमती सुचिता भिकाने, अपर जिल्हाधिकारी यांच्या सेवा अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या., यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून त्यांनी अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या., यांचेकडे तात्काळ हजर व्हावे.

५. श्रीमती सुचिता भिकाने, अपर जिल्हाधिकारी यांनी " कार्यकारी संचालक (मानव संसाधन) महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या., मुंबई" या प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू झाल्याबाबतचा अहवाल energy२.ield-mh@gov.in या ई-मेलवर /टपालाद्वारे शासनास त्वरीत कळवावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा २०२५०४३०१४२४०९८९१० संकेतांक असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by UDDHAV RABHAJI DAHIPHALE
Date: 2025.04.30 14:25:35 +05'30'

**(उद्धव दहिफळे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. अपर मुख्य सचिव सचिव (उर्जा), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई

२) मा. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या, प्रकाशगंगा, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री , ऊर्जा यांचे खासगी सचिव, मुंबई.
३. मा.अ.मु.स (महसूल), महसूल व वन विभाग यांचे स्वीय सहायक.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
५. अधिदान लेखा अधिकारी/निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. श्रीमती सुचिता भिकाने, अपर जिल्हाधिकारी.
७. निवडनस्ती-ऊर्जा-२.